**अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. पमुवा -२०१९/प्र.क्र.९३/अ-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - ०४ ऑक्टोंबर, २०१९

वाचा :-१) वित्त विभागाचा शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

२) वि.आ.अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/भूसं-१/पुनर्व/कलि/कावि-३९४/२०१९, दि.२४.०९.२०१९.

**शासन निर्णय :-**

अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ५६ अस्थायी पदांना दि. ३०.०९.२०१९ पर्यत मंजूरी देण्यात आली होती. अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ५६ अस्थायी पदांची आवश्यकता असल्याने सदर अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास विभागीय आयुक्त, अमरावती यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.१ च्या आदेशानुसार अस्थायी पदांना दि. ०१.१०.२०१९ ते दि.२९.२.२०२० पर्यंत मुदतवाढीचे अधिकार प्रशासकीय विभागांना दिले आहेत. सदर शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन राहून वरील ५६ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दि.२९.२.२०२० पर्यंत मुदत वाढीस खालील नमूद अटींच्या अधिन राहून मंजुरी देण्यात येत आहे.

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचा-यांना विभागांतर्गत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागातील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) उक्त ५६ अस्थायी पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही व सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

३) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४) ही सर्व पदे त्या विभागाच्या स्थायी संवर्गात तात्पुरती म्हणून समजण्यात यावीत .

५) सदर पदे शासनाच्या वेळोवेळी काढण्यात आलेल्या आदेशाप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

२. याबाबत होणारा खर्च --योजनेतर पदांवरील खर्च ``मागणी क्र. सी-१/२०२९/जमीन महसूल-००१-संचालन व प्रशासन(००१)(१) भूसंपादन आस्थापना (१)(०४), आयुक्त, अमरावती वेतने योजनेतर (२०२९ ०२३३) तसेच (२०२९०१०८) या लेखाशीर्षाखाली आणि योजनांतर्गत पदांवरील खर्च मागणी क्रमांक सी-१,२०२९ जमीन महसूल ००१- संचालन व प्रशासन-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०२) भूमी संपादन आस्थापना-(योजनांतर्गत)(०२)(०६) आयुक्त, अमरावती वेतने (२०२९ २५१०१) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली खर्ची

टाकण्यात यावा व तो वित्तीय वर्ष २०१८-१९ तसेच २०१९-२० साठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा तसेच याबाबतचा प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादन विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.॰॰

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शा. नि. क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९१००४१७०९३२२३१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Ganesh Sonkhaskar

Digitally signed by Nitin Ganesh Sonkhaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad84daad5bc79f6d90c62a987708b24ed191867c04fb6c815de59aff3e614298, cn=Nitin Ganesh Sonkhaskar
Date: 2019.10.04 17:10:15 +05'30'

**( नि. ग. सोनखासकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती (२ प्रती)
२) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर (२ प्रती)
३) जिल्हाधिकारी, अमरावती /अकोला/बुलढाणा/वाशिम/यवतमाळ.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती /अकोला/बुलढाणा/वाशिम/यवतमाळ.
५) जलसंपदा विभाग, कार्यासन टि-४/टि-१२/टि-१९,मोप्र-२,अर्थ -१ व बी शाखा, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय ,मुंबई-३२.
७) नगर विकास विभाग ,मंत्रालय ,मुंबई-३२.
८) अर्थ-९, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९) अवर सचिव / कार्यासन अधिकारी, अ-२/अ-३/अ-४/ई-१/ई-६/ई-७/ई-८/ब-१,र-१२ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवडनस्ती/अ-१, मंत्रालय, मुंबई-३२.